**रेशीम संचालनालयातील तांत्रिक पदांसाठी ऑनलाईन पध्दतीने परिक्षा घेण्याकरिता रेशीम विषयक बाबींचा समावेश करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्र. सपववि-४००२५/५/२०२३ – DESK SERICULTURE-CMTD**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक:- ०८ जून, २०२३

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं-१२२२/प्र.क्र.५४/का १३-अ, दि.०४.०५.२०२२

२) संचालक, रेशीम संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचा दि.११.०१.२०२३ रोजीचा प्रस्ताव

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाचे भूतपूर्व दुय्यम सेवा निवड मंडळाच्या कक्षेतील गट-ब (अराजपत्रित), गट-क, गट-ड संवर्गातील नामनिर्देशानाच्या कोटयातील पदांच्या सरळसेवा भरतीची कार्यपध्दती विहित करण्याचे धोरण आहे. सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०४.०५.२०२२ मधील परिच्छेद क्र.८ “परिक्षेचे स्वरूप” यामध्ये ज्या पदांसाठी शारीरिक व व्यावसायिक चाचणी आवश्यक नाही अशा पदांसाठी तसेच शारीरिक व व्यावसायिक चाचणी आवश्यक असलेल्या पदांसाठी ऑनलाईन पध्दतीने परीक्षा कशी घ्यावी, याबाबतची तरतूद नमूद केली आहे. तसेच अराजपत्रित गट-ब, गट-क व गट-ड मधील सर्व पदाकरीता उमेदवारांची निवड करतांना मराठी, इंग्रजी, सामान्य ज्ञान व बौध्दिक चाचणी या विषयावरील प्रश्नाकरीता प्रत्येकी ५० गुण ठेवून एकूण २०० गुणांची चाचणी परिक्षा सर्वसाधारणपणे पदभरती करीता घेण्यात यावे असे नमूद आहे.

रेशीम संचालनालयातील पदभरतीकरीता रिक्त असलेली सर्व पदे ही तांत्रिक स्वरूपाची असल्याने रेशीम उद्योग विषयाचे तंत्रज्ञानाची सखोल माहिती असलेले उमेदवारांची निवड होणेचे दृष्टीने ऑनलाईन (Computer Based Test) पध्दतीने परिक्षा घेण्याकरीता विषयानुरूप मुल्यांकन असावे जेणेकरून रेशीम शेतकऱ्यांना मार्गदर्शनाचा फायदा होऊन रेशीम शेतीचे क्षेत्रात वाढ होण्यास मदत होईल. त्याअनुषंगाने रेशीम संचालनालयातील तांत्रिक पदांसाठी ऑनलाईन पध्दतीने परिक्षा घेण्याकरीता वस्तुनिष्ठ बहुपर्यायी मध्ये रेशीम विषयक बाबींचा समावेश करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

रेशीम संचालनालयातील तांत्रिक पदांसाठी ऑनलाईन पध्दतीने परीक्षा घेण्याकरीता विषय व प्रश्नाची संख्या आणि परीक्षेचे एकूण स्वरुप खालील तक्त्यानुसार करण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहेः-

<table>
<tr><th>पदनाम</th><th>विषय</th><th>भाषा</th><th>प्रश्नांची संख्या</th><th>वेळ</th><th>परिक्षेचे स्वरूप</th></tr>
<tr><td rowspan="6">गट-ब<br>रेशीम विकास अधिकारी, (अराजपत्रित), श्रेणी-२<br>गट-क<br>वरीष्ठ तांत्रिक सहायक, वरिष्ठ क्षेत्र सहायक, प्रयोग निर्देशक व क्षेत्र सहायक, रेअरिंग ऑपरेटिव्ह<br>गट-ड<br>प्रयोगशाळा परिचर</td><td>इंग्रजी</td><td>इंग्रजी</td><td>१०</td><td rowspan="6">२ तास</td><td rowspan="6">वस्तुनिष्ठ - बहुपर्यायी व प्रत्येक प्रश्नास २ गुण</td></tr>
<tr><td>मराठी</td><td rowspan="5">मराठी</td><td>१५</td></tr>
<tr><td>सामान्य ज्ञान</td><td>२५</td></tr>
<tr><td>रेशीम विषयाचे तांत्रिक ज्ञान</td><td>३०</td></tr>
<tr><td>बुध्दीमत्ता चाचणी व संगणक ज्ञान</td><td>२०</td></tr>
</table>

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | **एकूण** | **१००** | | |

**३.** हा शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र.४७/का.१३ अ, दि.१८ मे, २०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. तसेच सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०४.०५.२०२२ रोजीच्या शासन निर्णयानुसार भरतीच्या कार्यपध्दतीचा अवलंब करण्यात यावा.

**४.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६०८१५२९३५९१०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ALKA V JAGTAP

Digitally signed by ALKA V JAGTAP
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT,
2.5.4.20=448f510bcadc7abd929408343ee74834ba4d3c8add456b66852582b6097ed093, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=32CC1545A1B50545BD5194D8C8A8B31532D9A97E1216092600CDFE0B5E29CEA1, cn=ALKA V JAGTAP
Date: 2023.06.08 15:30:34 +05'30'

**( अलका जगताप )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१. मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांचे खाजगी सचिव
२. सचिव (वस्त्रोद्योग) यांचे स्वीय सहाय्यक
३. संचालक (रेशीम), रेशीम संचालनालय, प्रशासकीय इमारत क्र.२, ६ वा माळा, आयुक्त कार्यालय, परिसर, नागपूर ४४० ००१
४. कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग (का.१३ अ), मंत्रालय, मुंबई
५. निवडनस्ती (रेशीम कक्ष).